कार्यकारणभाव -१

१

---

मी आरती यादव. कॉलेज च्या सुट्टी मध्ये मी माझ्या काकांकडे काही दिवसांसाठी रहायला आले होते. माझे काका 'प्रताप यादव' जळगाव मधिल एक प्रतिष्ठीत व्यक्ती. पाटबंधारे खात्यामध्ये मोठ्या पोस्ट ला लाथ मारुन अखिल भारतीय नौजवान संघटनेचे पुर्णवेळ कार्यकर्ते बनले होते, या गोष्टीला जवळ जवल पाच वर्षे झाली असतील. समाजकार्यामध्ये पुर्णवेळ वाहुन घेतल्यामुळे त्यांच्या घरी लोकांचा राबता खुप असायचा. काकांच्या वडिलोपार्जीत बंगल्यामध्ये काका स्वतः त्यांची बायको लता म्हणजे माझी काकी व त्यांची साधारण माझ्या वयाची मुलगी सुष्मा सोबत घरकामासाठी ठेवलेले दोन नोकर होते. वडिलोपार्जीत इस्टेटीमुळे काकांना वेगळी नोकरी न करने परवडणारे होते. त्यांचा बंगला बराच मोठा, समोर बगिचा , बंगल्यापासुन थोड्याच अंतरावर त्यांचं शेत होतं, घरामध्ये लता काकू बोलायला निखळ तशीस सुष्मा मनमिळाऊ होत्या, त्यांच्यासोबत दिवस कसा जात कळत नसे. काकांकडे रहायला यायला मला नेहमीपासुन आवडे, याही सुटीच्या वेळी चांगली पंधरा दिवस मी इथे राहणार होते. पण या वर्षीची सुटी काकांच्या घरात मजेत गेली नाही, त्याला कारणही तसं होतं.

पंधरा दिवस तो चाललेला भयानक प्रकार अजुन माझ्या डोळ्यासमोरून जात नाहीये, आता सगळे वातावरण पुर्ववत झाले असले तरी, ती परिस्थिती फेस करत असताना जो मानसिक त्रास होत होता त्याचा प्रभाव अजुन मनावर आहे. सुष्मा आता बरी झाली असली तरी, तिच्याकडे पाहीले की अजुन पोटात धस्स होते. तिला आमच्या पासुन बजुच्या  ज्या रूम मध्ये त्या अवस्थेत ठेवले होते, त्या रूम मध्ये पाठ ठेवायला मण अजुन धजावत नाही. त्यावेळी तिने वापरलेले कपडे अजुन तसेच त्या रूम मध्ये पडले आहेत. आता संकट नाहीसे झाले आहे, सुष्मा ची तब्बेत सुधारत आहे, ती त्याच्या प्रभावातुन बाहेर आलेली आहे, पण पायात रुतलेला काटा काढून टाकल्यावर सुद्धा त्या काट्याने पायात शिल्लक ठेवलेली घाण जशी अधुन मधुन टोचू लागते, तसं सुष्मा शी बोलताना अजुन सुद्धा आपण त्याच्याशी बोलत आहोत असा भास होतो. ज्या खोलीत तिला ठेवले होते, त्या खोलितील भिंतिंना पडलेली भगदाडे मुजवायचेही धाडस आम्हाला होत नाहीये. त्या खोली मध्ये राख आणि कुंकु चे डाग अजुनही तसेच आहेत. ज्या गोष्टीला आम्ही आजपर्यंत अजिबात महत्व दिले नव्हते त्याच गोष्टीने या संकटातुन आम्हाला

यातुन बाहेर काढले होते, आम्ही आमचा हेका न सोडता त्या मांत्रिकाला न बोलवता वैद्यकीय उपचारावर अवलंबुन राहीलो असतो तर कधाचीत सुष्माला आम्ही गमावले असते. या गोष्टींवर आमच्या घराण्यत तरी कोनाचा विश्वास नव्हता, मी स्वत: सायन्स ची स्टुडन्ट होते, पण सायन्स चा असाही एक पैलू असु शकतो हे कळण्यासाठी आम्हाला खुप मोठ्या माणसिक यातनेच्या दिव्यातुन जावे लागले. काका ज्या गोष्टीच्या विरोधात लढले, तिच गोष्ट त्यांच्या वाट्याला आली होती. काही गोष्टी केवळ आपल्याला पटत नाहीत म्हणुन अंधश्रद्धा या नावाखाली त्यांचा विरोध करत असतो. श्रद्धा व अंधश्रद्धा या गोष्टिंची त्या मांत्रिकाने केलेली व्याख्या अजुनही मला आठवते.

“एखादी गोष्ट आहे हे सिद्ध करता येत नाही, तशीच ती गोष्ट नाही हे सुद्धा सिद्ध करता येत नाही, तरी सुद्धा एखाद्याचा त्यावर विश्वास असेल तर ती श्रद्धा होय.”

“एखादी गोष्ट आहे हे सिद्ध करता येत नाही, पण ती गोष्ट नाही हे सिद्ध करता येते , तरी सुद्धा एखाद्याचा त्यावर विश्वास असेल, तर ती अंधश्रद्धा”. जे आजपर्यंत मोठ मोठ्या विचारवंतांना जमले नव्हते ते या मांत्रीकाने चार शब्दात जमवुन दाखवले होते. ते म्हणतात ते बरोबर आहे, ज्या लोकांकडे अस्सल ज्ञान आहेत ते कधीच प्रकाशझोतात येत नाहीत, समाजाच्या खालच्या थरावर त्यांचे काम चालू असते तसेच या मांत्रिकाचे होते. असो. माझी चुलत बहिण सुष्मा, नुकतीच जे.जे. वालचंद कॉलेज मध्ये बी.एस्सी च्या दुसऱ्या वर्षाची परिक्षा उत्तिर्ण झाली. सुष्मा अभ्यासात जेवढी हुशार होती, तिचे वागने बोलणेही तसेच मनमिळाऊ व निखळ होते. तिच्याशी एकदा बोलायला लागले की बोलतंच रहावे असे वाटत. जगातल्या कोणत्याही विषयावर बोलायची तिची तयारी असायची, तिच्यासमोर कोणताही विषय काढला तर तिच्याकडे त्या बद्दलचे मत आधिपासुन तयार असायचे. सुश्मा तिच्या स्वभावाप्रमाणे दिसायला ही गोड होती. एकदम साधा पेहराव , तिने भपकेबाज मेक-अप वगैरे केलेला  मी कधीच पाहीला नाही किंवा पार्लर मध्ये जावुन केसांची रंगरंगोटी किंवा केसांवर निरनिराळे प्रयोग तिने कधीच केले नाहीत आणि कदाचीत म्हणुनच ती सुंदर दिसत होती, तिचा साधेपणा तिच्या सौंदर्यात भर घालत होता असे म्हटले तर चुकिचे ठरणार नाही. पण कधीकधी चांगल्या व कोणाचेही वाइट न चिंतणाऱ्या लोकांच्याच बाबतीत वाईट घटना घडतात. व सुष्माच्या बबतित घडलेला प्रकार आमच्या कोणाच्याही डोक्या पलिकडचा व अनपेक्षीत होता. हे असं काही तरी असु शकतं आणि आपली सुष्मा त्याच्या तावडीत जाऊ शकते, ही गोष्टच न पचणार होती.

या सगळ्या प्रकाराची सुरवात झाली आजपासुन ठीक विस दिवसा आधी. सकाळी सुष्मा आपल्या एका मैत्रिणीकडे जाते म्हणुन गेली होती, ती संध्याकाळी साधारण सात वाजता घरी परत आलेली, त्यावेळी तिचा चेहरा पुर्ण उतरला होता. तोडा वेळ कोच वर बसुन ति आपल्या खोलित गेली. काकू व मी विचारल्यावर फक्त डोके खुप दुखत आहे, याच्याव्यतिरिक्त तिच्या तोंडातुन काही शब्द आले नाहीत. उन्हात फिरल्यामुळे डोके दुखत असेल असे समजुन काकुने तिला डोक्याची गोळी खायला दिली. थोड्या वेळाने जेवणासाठी वरण भात दिला, तो तिने बेडवर बसुनच खाल्ला व थोड्या वेळाने झोपी गेली.

नेहमी पहाटे उठणारी सुष्मा आज उठली नाही म्हणुन लता काकू तिला पहायला गेल्या तेव्हा, तिचे अंग तापाणे भणभणत होते, लता काकू आणि मी लगेच आवरा आवर करुन सुष्मा ला दवाखाण्यात घेवुन जाण्यासाठी रघु काकांना गाडी काढायला सांगीतले. या वेळी प्रताप काका मुक-बधीर लोकांच्या आंदोलणासाठी जिल्हा-परिषद कार्यालयासमोर धरणे आंदोलनाच्या व्यापात होते. सुष्मा ला मी आणि लता काकू ने उठवुन गाडीत बसवले, चालत असताना ती अर्धवट झोपेतच होती . आज तिचा चेहरा थोडा बदलल्या सारखा वातत होता, एखाद्या मुर्तीकाराने कोरुन काढल्या सारखे डोळे आज भकास दिसत होते, ओठांवर एक काळपट सर आली होती. ताप व जास्त झोपेमुळे असे होऊ शकते, मी दुर्लक्ष केले. ।
दवाखाण्यात गेल्यावर सुष्माचा बिपी ओके होता, अंग थोडे गरम लागत होते त्यावर शुक्ला डॉक्टर नी इंजेक्शन व गोळ्या लिहुन देवून, एका दिवसात ताप कमी येईल असे सांगीतले.

सुष्मा ला घेवुन परत येत होतो. गाडिमध्ये सुष्मा अर्धवट झोपेतच होती, तिचा तोल जाऊ नये म्हणुन मी तिचा हात घट्ट धरला होता, तिचा चेहरा माझ्या खांद्यावर टेकला होता. मला हताला काहीतरी चिकट लागले, सुष्माच्या हातातुन काहीतरी द्रव्य येत होते. तिच्या टि-शर्ट चा हातोपा वर दंडापर्यंत नेल्यावर लक्षात आले की ते द्रव पदार्थ आताच दिले गेलेले इंजेक्शन होते. लता काकु हा प्रकार पाहुन दचकल्या, पण पुन्हा गाडी गचक्या आणि खड्ड्यांतुन सात-आठ किलोमिटर चा प्रवास सुष्माला सहण होणार नाही म्हणुन आम्ही गाडी पुन्हा दवाखाण्यात नेली नाही. घरी गेल्यावर सुष्माला थोडा वरण-भात खाऊ घालून गोळ्या खायला दिल्या. तिला झोप येत असल्याने तिला व्यवस्थित झोपी घालवुन मी व लता काकू खाली स्वयंपाक घरात येवुन

संध्याकाळच्या स्वयंपाकाची तयारी करायला लागलो.

संध्याकाळी चहा घेवुन सुष्माच्या रूम मध्ये गेले. तेव्हा शी: यार हे सुष्माला असे काय होत आहे ? मगाशी दिलेले सगळे इंजेक्शन आपोआप बाहेर आले होते आणि आता तिने आपल्या बिछाण्यावरच उलटी केली होती, मगाशी दिलेल्या सगळ्या गोळ्या तिने बाहेर काढल्या होत्या. आणि तशाच अवस्थेत ती  गाढ झोपलेली होती. बिचारी सुष्मा , मी तिला एकटीला का सोडून गेले ? हतातील चह अतसाच ठेवुन ती घाण साफ केली, रूम मध्ये एक प्रकारची कुबट दुर्गंधी पसरली होती व खुप भकास पणा चाणवत होता, म्हणुन मी बाजुच्या खिडक्या उघडल्या, थंड वाऱ्याचा झोत आतमध्ये आला तसे जरा जिवंत वाटू लागले. मी खाली किचन मध्ये एक्स्टेंशन वरुन लता काकुंना बोलावुन घेतले. त्यांना उलटीचा प्रकार सांगीतला. सुष्माच्या अंगाला हात लाउन बघितले , ताप असुन जसाच्या तसा होता. लता काकू सुष्माला झोपेतून उठवण्याचा प्रयत्न करु लागली, खुप प्रयत्नाने सुष्मा झोपेतुन जागी झाली असली तरी ती अजुन अर्धवट झोपेत होती. डोळे अर्धवट उघडे होते, व मधुन मधुन पुन्हा डोळे झाकायची. आता मात्र हद्द झाली होती सुश्माला यान आधीही किती वेळा ताप आला होता, आजारी पडली होती पण आजच्या सारखा प्रकार प्रथमच आम्ही पाहत होतो. सुष्माला अशा अवस्थेत पाहावत नव्हते. लता काकुंनी रघु काकांन अपटकण गाडी काढण्यास सांगीतले. पुन्हा आम्ही तिला खांद्याने आधार देत गाडी पर्यंत आणले. दरम्यान ती अर्धवट झोपेत होती व काहीतरी पुटपुटत होती. मला किंवा लता काकुंना स्पष्टपणे ऐकु आले नाही. पण गाडीवर बसल्यावर मात्र तिचे अतिषय दबलेल्या आवाजात पण गाडिच्या हॉर्ण इतके स्पष्ट शब्द कानावर पडले, “दवाखाण्यात नेवुन उपयोग नाही......ट ट ट ट कुठलं ही औषध माझ्या शरिरात पसरणार नाही, एक तर परत बाहेर पडणार, र् र् र् ते तसे न झाल्यास त्याची रिएक्षण होणार... ”. सुष्मा काय बडबडतेय त्याचा अर्थ लावायची आता वेळ नव्हती. आम्ही तिला पटकण दवाखाण्यात घेवुन गेलो. आणि झालेला सगळा प्रकार शुक्ला डॉक्टर ना सांगीतला. दोन दिवस काही न खाल्ल्याने व झोपून राहील्यामुळे सुष्माला अशक्तपणा जाणवत होता, शुक्ला नी सलायन चढवायचे ठरवले. मी आणि लता काकू मिळून तिला बेड वर झोपवले, पान मिनिटांनी  डॉक्टर येवुन सलायन सुरु करुन गेले. आम्ही बाजुच्या दोन खुर्च्या घेवुन बसलो, प्रताप काकांना सांगायचे की नाही याचा विचार आता माझ्या मनात चालू होता. सलायन पुर्ण व्हायला साधारण तास भर तली लागणार होता. संध्याकाळचे आता सहा वाजत आले होते. मगाशी सुष्मा अशी का बडबडली असेल ? अंगात ताप असताना माणुस जाबडतो हे माहीत होते, ती असे का बोलली असेल असे हा विचार सारखा मनात येत होता. मी विचारामध्ये

गर्क असतान माझे लक्ष वर टांगगलेल्या सलायन च्या बाटलीकडे गेले, आणि भितीने माझ्याही न कळत तोंडातुन किंकाळी फुटली.

“काकू !!! डॉक्टर ........ सलायन .... र र र र  क्क्त ...!!!”.

अर्धवट विचारात असलेली लता काकू अनपेक्षीत आवाजाने गांगरली, बाहेर बसलेली नर्स पळत आत आली, आणि माझ्याही नकळत सलायनच्या बाटली कडे गेलेले माझे बोट पाहुन नर्स ला झालेला प्रकार कळाला, तिने पटकण सलयन चा सप्लाय थांबवला व शुक्ला डॉक्टर न बोलावुन आनले. सलायन चा सप्लाय बंद केला असला तरी ज्या सलायन ची सुई ज्या ठिकाणी लावली होती त्या शिरे मधुन रक्तप्रवाह चालूच होता, सुष्मा च्या शरीरात जेवढे सलायन गेले होते तेवढे त्या रक्तासोबत परत येत आहे असे दिसत होते, खुप प्रयत्न करुन सुद्धा शुक्ला सरांना तो रक्तप्रवाह थांबवता येईना, शेवटी तो प्रवाह आपोआप थांबला हे बघुन जिवात जिव आला, शुक्ला सरांनी त्या ठिणाणी मलम लावुन ड्रेसिंग गेले जेणेकरुन त्या जागेतुन पुण्हा रक्तप्रवाह चालू होणार नाही. शुक्ला सर उठले त्यांचे लक्ष सलायन च्या बॉटल कडे गेले, त्या बॉटल ची नळी रक्ताने पुर्ण लाल झाली होती, ज्या नळीतुन सलायन मधील पातळ औषध सुष्माच्या शरीरात जात होते, त्याच्य नळीतुन उलटा प्रवाह चालू होऊन  सुष्माचे रक्त त्या बाटलीत भरले गेले होते. आता हद्द होती, लता काकू नी जरा ही वाट न बघता प्रताप काकांना फोन करुन झालेला सगळा प्रकार सांगुन टाकला. इकडे डॉक्टर शुक्लांना काय करावे कळत नव्हते, असला प्रकार त्यांना पुर्णपने नविन होता. त्यांनी शेवटी सुष्मा साठी काही टेस्ट्स सजेस्ट करुन सिटी हॉस्पिटल मध्ये एडमिट करण्यास सांगीतले. आम्ही डॉक्टर च्या केबीन मध्ये असतानाच प्रताप काका आले.

“लता काय झाले ?”

“दोन दिवस झाले तापानी भणभणतिये सुष्मा, तेव्हापासुन झोपून आहे, कसल्याही औषधाचा काही परिणाम होत नाहीये, अशक्तपणा ही खुप आलाय.....”, भरल्या डोळ्यांनी लता कालू बोलत होत्या.

“डॉक्टर ?” प्रश्नार्थक नजरेनी प्रताप काकांनी फॅमिली डॉक्टर शुक्लांकडे पाहीले.

“वेल्ल... मिस्टर प्रताप, तिचे शरीर कोणतेही औषध एक्सेप्ट करत नाहीये, मी काही तेस्ट्स लिहुन दिल्या आहेत, त्या करुन घ्या आणि तिला सिटी हॉस्पीटल मध्ये एडमिट करा.” प्रताप काकांच्या हातात एक चिठ्ठी देत शुक्ला सर बोलले. प्रताप काका आल्यामुळे आम्हाला थोडा धिर आला. डोक्यावरचे ओझे बरेच कमी झाल्यासारखे वातत होते.

... तिचे शरीर कोणतेही औषध एक्सेप्ट करत नाहीये... शब्द कानावर पडताच असंच सुष्मा

बोलली होती मगाशी कार मध्ये असताना. कोणतेहि औषध काही असर करणार नाही हे सुष्मा ला कसं माहीत असु शकत होते ? एर्हवी दोन दिवसात चुकुन एखादा दुसरा शब्द बोलणारी शुष्माने तिला ताप आल्यापासुन हे एकच वाक्य होतं जे ती स्पष्ट एका दमात बोलली होती. डोके चालाययला काही पर्याय नव्हता.

सुष्माला सिटी हॉस्पिटल मध्ये हलवले. सुष्माचे ब्लड आणि युरिन चे सँपल्स घेवुन शुक्ला सरांनी सजेस्ट केलेल्या टेस्ट्स करुन घेतले, त्याचे आलेले रिपोर्ट्स पुर्णपने नॉर्मल दाखवत होते. सिटी हॉस्पिटल मध्ये एडमिट केल्यानंतर सुद्धा हाच प्रकार, कोणतीही गोळी , इंजेक्शन सुष्माला दिले असता ते त्याच वाटे परत यायचे. आणि सुष्मा जास्त अशक्त दिसत. दरम्यान सुंदर आणि सुबक दिसणारी सुष्मा भेसूर आणि भयान दिसायला लागली होती, तिचे डोळे आता खोल गेले होते आणि डोळ्या भोवती काळी वर्तुळं आली होती, गौरवर्णीय तिच्या चेहऱ्यावर ती वर्तूळं अगदी उठुन दिसत होती. ओठ पुर्ण काळे पडून वाळले होते, आणि आता तर ओठ फुटून त्यातुन हललेसे रक्त येवु लागले होते. गाल पुर्ण सुजले होते, माने भोवरी वळ्या पडल्या होत्या आणि सिंहकटी असलेली सुष्मा आता अपेक्षे पेक्षा जाड दिसायला लागली होती, प्रथमक्षणी कोणी पाहीले असता ही सुष्माच आहे हे कोणालाही पटले नसते, पण हा बदल मझ्या नजरे समोर घडत होता.

आज सिटी हॉस्पिटल ला सुश्माला हलवुन दोन दिवस उलटले होते, तिच्या तब्बेतीमध्ये काही प्रगती दिसुन येत नव्हती, ना कोणते औषध द्यायची सोय होती, एलोपॅथिचे औशध घेत नाही म्हणुन आयुर्वेदीक औषधेही द्यायचा प्रयत्न केला पण तो ही व्यर्थ , शेवटी प्रत्येक प्रयोगा सरशी तिची हालत आनखीन नाजुन होत होती , त्यामुळे आता औषध द्यायचे बंद केले, त्यातल्या त्यात सलायन मधुन ग्लुकोज ची पावडत मात्र चालू ठेवता येत होती ही एकच काय ती जमेची बाब. हॉस्पिटल मधले डॉक्टर सुद्धा आता हार मानायच्या स्टेज मध्ये आले होते. डॉक्तर सजेस्ट करतील त्या सगळ्या टेस्ट्स करुन पाहील्या पण सगळे रिपोर्ट्स नॉर्मल येत होते. सगळा प्रकार एकंदरीत डोक्याच्या बाहेरचा होता. या दरम्यान सुष्मा झोपुनच असायची, सुरवातीला जास्तित जास्त दिवसातुन ती चार पाच वेळा उठायची , तिही फक्त पाच ते दहा मिनिटांसाठी आणि त्यातही ती अर्धवट झोपेत व काहीही बोलण्याच्या परिस्थितीत नसायची, आता हे प्रमाण हळू हळू कमी होत आले होते, आज दिवस भरात ती दोन वेळाच उठली होती. सगळ्यांना भिति वाटायला

लागली होती. आणि अशातच असे काही घडून गेले, ज्या घटनेने आम्हाला हा प्रकार वेगल्या एंगल ने विचार करायला भाग पाडले.

***

३

---

आतापर्यंत ही बातमी आमच्या नातेवाईकांमध्ये पसरली होती, रोज कोनी ना कोणी सुष्माला पहायला येत होते. सुष्माच्या कॉलेज मध्यले खुप मित्र मैत्रिणी भेटून गेल्या, काही जण आल्यापासुन सुष्माची अवस्था बघुन इथेच ठाण मांडुन बसलेले. आम्हाला काय हवं नको ते बघत होते. सुष्माला सिटी हॉस्पिटल मध्ये आणल्यापासुनचा हा चौथा दिवस होता, संध्याकाळचे जवळ जवळ सात वाजले होते. सुष्माच्या रूम च्या बाहेरील बाकड्यावर सगळे बसुन चर्चा करत होते. पुढे काय करायचे, कींवा पुढे दुसऱ्या हॉस्पिटल मध्ये हलवायचे का ? प्रत्येज जण हा प्रकार आपापल्या तर्का प्रमाणे मांडत होता, सुष्माचा मित्र असलेला प्रभाकर हा आपले मत मांडण्यापासुन परावृत्त करु शकला नाही.

“प्रभाकर काका, मला काय म्हणायचे आहे ..” प्रभाकर

“हा बेट बोल ..”

“काका, कदाचीत तुम्हाला पटणार नाही, किंवा तुम्ही म्हणाल की हा काय बोलतोय, कदाचीत हे तुमच्या तत्वात बसणार नाही....”

“प्रभाकर, तुला जे काय बोलायचे आहे ते स्पष्ट आनि नि:संकोच बोल..”

“हो... पण प्रश्न सुष्माचा आहे त्यामुळे मला बोलल्यावाचुन रहावत नाही. माझ्या मित्राचा बाबतीतही थोडे फार असेच घडले होते काही वर्षांपुर्वी,...” प्रभाकर बोलू लागला, सर्वांचे लक्ष सुधाकर कडे एकवटले . सगळे आपल्याकडे बघताहेत हे बघुन थोडंस सावरुन प्रभाकर पुढं बोलू लागला.... “ सुधाकर त्याचं नाव, त्याच्या पाठीमागे असा काही त्रास लागला होता की जो आमच्या डोक्याच्या बाहेरचा होता. एकावर एक अशी संकटं त्याच्यावर कोसळत होती, पुढे त्याला एक आजार झाला, ज्याचे निदान करण्यासाठी नाही म्हणाल तर आम्ही पन्नास एक दवाखाने फिरलो असेल, त्यात अलोपॅथि, होमियोपॅथी, आयुर्वेद सगळं करुन बघितलं पण त्याच्या रोगाचे

निदानच कोणाला करता येईना, मोठमोठ्या डॉक्टर्स नी त्याच्यापुढे हात जोडले, आणि शेवटी अशाच एका मोठ्या नामांकीत डॉक्टर कडे गेलो होतो, सुधाकर चे सगळे रिपोर्ट्स नॉर्मल असताना त्याला व्याधी होती. सेम आपल्या सुष्मा प्रमाणे,  त्याला ही हा प्रकार काही समजला नाही, पण त्याने आम्हाला एक सल्ला दिला , ते डॉक्टर आम्हाला बोलले की हा प्रकार बहिरवासाचा आहे .. सुरवातीला आम्हाला कळाले नाही, पण नंतर त्याने स्पष्ट करुन सांगीतले की असे काही प्रकार असतात , ज्यांचा उपाय कोणत्याही डॉक्टर च्या किंवा मेडीकल सायन्स कडे नसतो. त्याने आम्हाला सांगितले की हा प्रकार भुतबाधेचा किंवा करणीचा आहे.” बाकीच्या लोकांकडून काय रिप्लाय येतोय याचा अंदाज लावण्यासाठी प्रभाकर थांबला. आणि भुतबाधेचा व करणी हे शब्द ऐकल्यावर बसल्यांपैकी काही आतल्या आत हसायला लागले तर काहींची प्रतिक्रिया ’ हत्तिच्या,   ’ अशाप्रकारची होती तर काहींनी कपाळाला हात लावला. पण बहुतेक प्रभाकर ला बाकीच्यांशी काही देणे घेणे नव्हते, तो एक टक काकांकडे त्यांच्या प्रतिक्रियेसाठी बघत होता, काका मात्र हाताची घडी घालून शांत उभे होते त्यांनी कोणतीही प्रतिक्रिया दिली नाही, हे पाहून प्रभाकर पुढे बोलू लागला.... “ एवढे सांगुन त्या डॉक्टर नी आम्हाला एका मांत्रिकाचा नंबर दिला, आम्ही त्याला जाऊन भेटले, त्याने आम्हाला काही विधी करायला सांगुन आमुक आमुक या दिवशी माझी वाट पहा असे सांगितले, आम्ही त्या मांत्रीकाने सांगितलेले विधी उरकून घेतले. त्या मांत्रिकाने सांगितलेला दिवस एका आमावस्येचा होता, त्या दिवशी तो आला आणि सुधाकर वर ना ना प्रकारचे तांत्रिक प्रयोग करुन एकही रुपया आमच्याकडून न घेता गेला, पण त्या दिवसापासुन सुधाकर ची तब्बेत सुधरायला लागली व केवळ एका महिण्याभरात त्याचा सगळा त्रास थांबला , त्या मांत्रीकाचा नंबर आहे माझ्याकडे , काका ! सुष्मा बरी होणार असेल तर एक प्रयत्न म्हणुन करायला काय हरकत आहे ”.... प्रभाकर बोलायचा थांबला आणि काकांच्या उत्तराची वाट बघु लागला...

“एकही रुपया न घेता तो मांत्रिक गेला .. ? नक्की तुमच्या घरातल्या सगळ्या वस्तू निट चेक केल्या ना ? ” काकांचा एक मित्र उपहासाने बोलला व प्रभाकर चा हशा उडाला.

“ही कुठली, नारायण धारपांच्या पुस्तकातली कथा आहे का ? कुठे तरी वाचल्यासारखी वाटते” तिथे बसलेल्यांपैकी दुसऱ्या एका व्यक्तीने पुन्हा प्रभाकर चा उपहास केला. मला प्रभाकर च्या डोळ्यातला राग चांगला दिसत होता, पण मी काही करु शकत नव्हते हा सगळा प्रकार चालू असताना माझ्या लक्षात आले की सुष्मा आत एकटीच आहे, तिच्याजवळ कोनी नाही, एक चक्कर टाकुण परत येवुया म्हणुन मी तिथुन उठले. सुष्मा च्या रूम चे दार उघडले, आणि.....

एक प्रदिर्घ किंकाळी माझ्या तोंडातुन निघाली, आपण हॉस्पिटल मध्ये आहोत हा विचार सुध्दा माझ्या मनात आला नव्हता. समोरचा प्रकार काय तो प्रकार ? सुष्मा झोपलेल्या अवस्थेत आपल्या बेड पासुन कोणीतरी उचलून धरल्यासारखी चांगली दोन फुट वर आलेली होती, अशी की तिचे पाय आणि हात खाली लोंबकळत होते. मी तिथे जायला , तो प्रकार पहायला आणि तेवढ्यात ति आहे त्या गतीने खाली बेड वर आहे त्या अवस्थेत फेकली गेली आणि 'धप्प' असा आवाज झाला, त्याची गती एवढी होती की सुष्मा या जिवंत आहे की तिचा जिव गेलाय याची त्या वेळी खात्री करुन घ्यावीशी मला वाटली पण मी इतकी घाबरले की मी खाली बसले, मझे हात पाय तो प्रकार पाहून थरथर कापत होते, माझी किंकाळी ऐकताच बाहेरच्या डेस्क वर बसलेले सगळे पळत आले. काही लोक सुष्माच्या ठिकाणी गेले, कदाचीत तिला काही झाले असेल हे बघुन मी ओरडले असेल. दोन  डॉक्टर काय झाले हे पहायल पळत आले. काकां मला बाहेर डेस्क वर घेवुन गेले, प्यापला पाणी दिले. मला शांत व्हायला थोडा वेळ गेला, बऱ्यापैकी सावध झाल्याव काकांनी मला काय झाले विचारले, जमलेल्या सगळ्यांचे लक्ष माझ्याकडे होते. मी काकांकडे बघुन बोलले.... "काका ! सुष्मा वर उडाली होती, चांगली दोन फुट, मी तिथे जाताच ति खाली आपटली, तिला एकदा चेक करा बरी आहे का, प्लिज...."
तसेच काकांनी तिथे असलेल्या डॉक्तर ना सुष्मा कडे जयाल सांगीतले. थोड्या वेळाने तो डॉक्तर परत आला, त्यावेळी सुष्मा गाढ झोपेत असल्याचे सांगीतले तेव्हा मला बरे वाटले. जमलेले सगळे लोक माझ्याकडे प्रश्नार्थक नजरेने पाहत होते, माझी अवस्था बघुन त्यांना मी जे सांगितले त्यावर विश्वास ठेवणे भाग होते. पण त्यांच प्रश्नार्थक नजरेत त्यांच्या मनाची तयारी तेवढी नाहीये असे दिसत होते. मी आता चांगली सावरले होते, उठुन सरळ प्रभाकर कडे गेले, तो या सगळ्या लोकांपासुन बाजुच्या एका चेअर वर कसला तरी विचार अक्रत बसला होता. मी सरळ त्याच्या समोर गेले, तसा तो भानावर आला व मझ्याकडे पाहू लागला..
"प्रभाकर ! सुष्मा साठी मी काहीही करायला तयार आहे, कोणी काही विरोध करुदेत, सुष्मा साठी आपण काहीही करु पन तिला बरं करु... " मला पुढं शब्द सुचले नाहीत. मनात दबुन ठेवलेल्या हुंदक्यांना मी वाट करुन दिली.

बाकी कोणाचा ही काही विचार न करता मी आणि प्रभाकर बाहेर आलो, तसा प्रभाकर ने फोन लावला, पण तो बहुतेक लागला नसावा..
"आरती, त्या मांत्रिकाचा नंबर लागत नाहीये... आऊट ऑफ कव्हरेज सांगत आहे,"

“एक काम कर , मेसेज टाकून ठेव. डिलिव्हर होईल तेव्हा आपण फोन करु परत. पण त्या मांत्रिकाला  मांत्रिक असंच म्हनतात का ? त्याला काही नाव ..?”
“हो आहे ना ! त्याचे नाव राज आहे, आणि दिसायला ही तो टिपिकल मांत्रिका सारखा नाही, ते भगवी वस्त्रे कमंडलू, दाढी वगैरे ... सिंपल आपल्या सारखा आहे पण त्याचा या प्रकरणात खुप अभ्यास आहे. देव करो आणि लवकरात लवकर त्याच्याशी आपला संपर्क होऊदे.”
“प्रभाकर , मगाशी मी जे पाहीले....” प्रभाकर ने मला तोडले...
“असुदे, त्याचा जास्त विचार करु नको, मला खात्री आहे की हा प्रकार नक्कीच बहिर्वासाचा आहे. पण हे बाकीच्या लोकांना सांगणार कोण ? सगळे सो कॉल्ड सोफिस्टीकेटेड आणि सुशिक्षीत त्यात काही तुमच्या काकांसारखे कम्युनिस्ट विचारसरणीचे”
“खरंच असले प्रकार जगात असतात ? म्हणजे भुत , करणी , बाधा वगैरे वगैरे”
“नक्कीच असतात, कित्येक लोकांनी अनुभवले आहेत, पण याचा गैरफायदा घेणाऱ्या काही खोटारड्य़ा तांत्रीक आणि बुवांमुळे हा सगळा बनाव फसवेगिरीचा आणि अंधश्रद्धेचा आहे असा पक्का समज झाला आहे, शिवाय हा प्रकार आपल्या तर्कबुद्धीला पटत नाही त्यामुळे बुद्धीवादी लोक याचा तिरस्कार करतात. हा जो राज आहे, तो या सगळ्या गोष्टीचा अभ्यासक आहे. ”
मझे समाधान झाले नसले तरी या प्रकारात जिज्ञासा मात्र निर्माण झाली होती.

***

## ४

---

सुष्मा आजारी पडून आज सातवा दिवस,. हॉस्पिटल मध्ये आनल्यापासुन सुष्माच्या तब्बेतीमध्ये काही सुधारणा दिसुन येत नव्हती ना खालावत होती. पुढच्या ट्रिटमेंट किंवा डिसिजन पर्यंत तिला दवाखान्यात न ठेवत घरी न्यायचा सर्वानी मिळून निर्णय घेतला आणि डॉक्टर्स नि सुद्धा त्याला सन्मती दिली तसेच पुढे सुश्मा वर कोणते आणि काय ईलाज करायचे यांच्यामध्ये डॉक्टर लोकांमध्ये अजुन मतभेद होते, त्यांच्यामध्ये एकमत होऊ पर्यंत सुष्माला घरी ठेवायचा पर्याय डॉक्टर्स ना योग्य वाटला. लगेचच आम्ही सुष्माला घरी हलवायला घेतले. या वेळी तिच्या शरिरातुन तिच्या नकळत झालेल्या मल-मुत्रामुळे दुर्गंधी सुटली होती. मध्यंतरीच्या काळात मी जो प्रकार हॅस्पिटल मध्ये पाहीला होता तोच प्रकार लता काकू आणि त्यानंतर आमच्या रघु नावाच्या नोकराने सुद्धा पाहीला

तेव्हा पासुन सुष्माला कोणी एकटं ठेवत नसे. रात्री सुद्धा कौनी ना कोणी तरी सतत तिच्याजवळ बसुन राहत असेल.

ठरल्याप्रमाणे काल रात्री मी सुष्मा जवळ थांबनार होते. रात्रीचे साधारण तिन वाजले असतील, मी तहाणेने खुप व्याकूळ झाले होते, सोबतची पाण्याची बाटली सुद्धा संपली होती, पण सुष्माला सोडून जायचे धाडस होते नव्हते, जावे की जाऊ नये या संभ्रमामध्येच अर्धा तास गेला, पण आता मी आणखी थांबु शकत नव्हते, मी तडक उठले आणि किचन मध्ये पळत जाऊन फ्रिज मधली पाण्याची बॉतल उचलली आणि तशीच पळत मागे सुष्माच्या रूम मध्ये आले, सुष्माच्या बेड कडे पाहीले.....
जायच्या आधी सुष्मा जशी होती आता पण ती तशीच होती, थोडक्यात काही घडले होते, काहीतरी घडेल या भितीने माझ्या छातीचे ठोके चांगलेच वाढले होते, मी पाण्याचा मोठा घोट घेतला, जरी काही घडले नसले, तरी नक्कीच काहीतरी बदल जाणवत होता. एक प्रकारची दुर्गंधी पसरलेली जाणवत होती, एखादा उंदिर मरुन पडल्यावर जसा घाणेरडा वास येतो त्यासारखा वास. थोड्या वेळाने तो वास येईनासा झाला.

आज सकाळी मी आणि लता काकू सुष्माला चहा देण्यासाठी आलो होतो तेव्हा सुष्मा कडे बघुन आश्चर्य वाटले, तिने चक्क डोळे पुर्ण उघडले होते, आणि ती झोपुनच जाईल तिथपर्यंत नजर फेकत होती. सुष्मा जागी झाली आहे हे पाहुन सुरवातीला आम्हाला आनंद झाला, पण आम्ही तिला बोलवत असुन सुद्धा ती प्रतिसाद देत नव्हती, काही बोलले की ती केवळ पहायची आणि परत तिचा खेळ चालू रहायचा,तिचे डोळे सुष्माचे डोळे वाटत नव्हते, त्या नजरेत एक अनोळखी छाप होती, लता काकूने प्रताप काकांना बोलावुन आणले, तिथे तिच्या सेवे साठी असलेल्या नर्स ने आपल्या डॉक्टर ना फोन करुन सांगीतले. सर्वजण तिथे जमा झाले , सगळ्यांनी तिचे लक्ष वेधुन घेवुन बोलायला लावायचा प्रयत्न केला, पण व्यर्थ ति फक्त सर्वांवरुन नजर फिरवत होती, कोणाच्या शब्दाला तिचे काही प्रत्युत्तर नव्हते. सुष्मा जागी झाल्याचा आनंद क्षणात मावळला, आता हा प्रकार नविन चालु झाला, एर्हवी डोळे ह न उघडणारी सुष्मा आज डोळे झाकायला तयार नव्हती. आजचा सगळा दिवस अशातच गेला, दुपारी आम्ही तिला उठवुन बसवुन काहीतरी खायला द्यायचा प्रयत्न केला पण व्यर्थ. ति काही खायला तयार नव्हती, किंबहुना कोणीतरी आपल्याला चारत आहे हे सुद्धा कळत नव्हते, असे वाटत होते की तीचे फक्त डोळे जिवंत असुन बाकी उरलेली सुष्मा अजुन झोपेत आहे. मी हा नविन प्रकार प्रभाकर

ला फोन करुन सांगीतला, त्याच्या बोलण्यातुन हे पण कळाले की तो मांत्रीक अजुन सुद्धा संपर्क कक्षेच्या बाहेर होता.
झाले एवढे प्रकार कमि होते म्हणुन की काय या सगळ्याच्या दुसऱ्या दिवशी, आम्ही स्वयंपाक घरात व्यस्त होतो, सुष्मा जवळ रघु काका बसले होते, अचानक रघु काका पळत येताना दिसले. रघु पळत सरळ स्वयंपाकघरात घुसला.
“वैनि... सुष्मा ...”
“काय रघु .... बोल... ” लता काकू
“सुष्मा, खायला मागतिये”....
हे वाक्य ऐकताच आम्ही तडक सुष्मा च्या रूम मध्ये गेलो, ति उठुन शांत बसली होती, आम्ही येताच तिने आमच्याकडे पाहीले व बोलू लागली
“मला भुक लागलीये”... सुष्मा स्वत:हुन खायला मागत आहे हे पाहुन बरे वाटले असले तरी, त्या आवाजात तिच्या नजरेप्रमाणेच अनोळखीपणा जाणवत होता, तो आवाज सुष्माचा वाटत नव्हता. एवढ्या दिवसाच्या आजारपणामुळे तिचा टोन बदलला असेल कदाचीत पण, आता ती आजारपनातुन उठली आहे असेही म्हणु शकत नव्हतो कारण तिची अवस्था आधी होती तशीच होती, ना त्यात सुधार होता, ना बिघाड होता. तिला झालेल्या बाहिर्वासाची ही पुढची स्टेज असेल काय ? की ती बरी होत आहे ? काहीच कळेना.
“काय करु बाळ खायला ?“ लता काकू.
आणि “कोंबडी” हा शब्द ऐकताच आम्हाला आश्चर्य वाटले कारण आमच्या खानदानात कधी कोणी मांस-मटण वगैरे पदार्था खाल्ले नव्हते, सुष्मा तर चुकुन पण नाही. ही असली काय मागणी करते आहे ? कदाचीत असे वाटून लता काकू तिला समजवण्याच्या सुरात बोलल्या..
“अरे बाळ ! असं काय मागतेस, थांब, मी मस्त तुझ्यासाठी गरम गरम वरण भात वरून तुप घालून आणते” आणि लता काकू उठल्या पण एवढ्यात...
“एकदा सांगितलेले कळत नाही का म्हातारे तुला ? मला कोंबडी हवीये” एकदम खडखडीत आवाजात सुष्मा ओरडली. मी आणि लता काकू अक्षरश: आ ! वासुन तिच्याकडे दोन मिनिटे बघत राहीलो. आम्हाला सुष्माचा चेहरा दिसु शकला नाही कारण उठुन बसल्याने तीच्यात धर नव्हती त्यामुळे ती कुबड काढून बसली होती, सहाजीक तिचे डोके पुधे झुकले गेले होते व डोक्यावरचे केस पुढे आले होते, तिच्या त्या मळलेल्या केसांमुळे तिचा चेहरा आम्हाला दिसला नाही. सुष्मा लता काकुंना 'म्हातारी' असे बोललि होती , विश्वासच बसत नव्हता. जे असेल ते

असेल , रघु काकांना कुठल्यातरी हॉटेल मधुन चिकन आणायला सांगितले , तोपर्यंत दवाखाण्यात गेलेल्या प्रताप काकांना आम्ही बोलावुन घेतले व घडलेला सगळा प्रकार सांगीतला. थोड्याच वेळात रघु आतात एक पिशवी घेवून आला, लता काकू नी त्यातले कलवन एका प्लेट मध्ये घेवुन सुष्मा जवळ गेली...

“बाळ हे घे ! तु सांगीतलेला खाऊ”

तशी सुष्मा ने ती प्लेट हतात घेतली, थोडंसं वास घेतल्या सारखे केले आणि !! आणि इतक्या जोरात फेकली की ति स्टील ची प्लेट मध्यातुन वाकली गेली. त्या प्लेट चा रूम मध्ये घुमत असलेला आवाज संपतो न संपतो तोवर सुष्मा परत ओरडाली

“हे काय घेवून आलाय ? जे सांगीतले ते कळत नाही का ??? जा फुटा इथुन सगळे, मला भुक लागली आहे, जिवंत कोंबडी पकडून आना ,... जा पळा लवकर.. ”

आता हद्द झाली होती. काकांचा चेहरा पुर्ण उतरला होता, आता काय करायचे अशा प्रश्नार्थक नजरेने आम्ही काकांकडे पाहू लागलो, तस ककांनी रघु ला कोंबडी बाजार मधुन एक जिवंत कोंबडी आणायला सांगीतले तेव्हा आमचा विश्वास बसला नाही. हा नविन प्रकार चालू झाला होता, विचार आता खुंटले होते. काय चांगले काय वाईट, बरोबर चुक याचा तर्क करण्याची अजिबात मन:स्थिती नव्हती. बाजुला लता काकू स्फुंदत बसल्या होत्या. मी पुन्हा प्रभाकर ला फोन करुन इकडे यायला सांगितले. प्रभाकर म्हणत असल्याप्रमाणे खरोखर हा बहिर्वासाचा प्रकार असेल तर होत असलेल्या घटणांवर व परिस्थितीवर आपला काहीच अधिकार चालणार नव्हता. सगळा प्रकार नविन व अतिशय अनपेक्षित होता. एक भिती आणि उत्सुकता होती की “या कोंबडीचे सुष्मा नक्की करणार तरी काय ?”.

आमच्या दुर्दैवाने या प्रश्नाचे उत्तर मिळायला आम्हाला वाट बघावी लागली नाही, समोरुन रघु काक दोन्ही हतामध्ये एक जिवंत कोंबडी घेवुन येताना दिसले.

त्यांच्या हातात तो बिचारा इवलुसा जीव आपल्या तोऱ्यात निवांत एखाद्या राजा सारखा बसला होता, काळाची किती वाइट झडप त्याच्यावर बसणार आहे याची ना त्या छोट्या जिवाला कल्पना होती ना आम्हाला. असहायपणे शांत पाहत उभे राहणे, हा एकच पर्याय त्यावेळी आमच्यापुढे होता. काका तसेच पुढे होऊन सुष्मा जवळ खाली मान घालून उभे राहीले. आपल्या बाजुला कोणीतरी थांबले आहे याची जाणिव कदाचित सुष्माला झाली असावी, मगापासुन एकदम स्थब्द असलेल्या सुष्माची थोडी चुळबुळ चालू झाली. तिची नजर काकांच्या हातात असलेल्या त्या छोट्या जिवाकडे गेली. हळू हळू ती बेड वर बसुनच पुढे सरकू लागली. आणि आपले दोन्ही हात

वर घेवुन चटकण काकांच्या हातातील त्या प्राण्यावर झडप घालून त्या कोंबडीला पकडले. सुष्माच्या झडपेने आधीच घाबरलेले काका मागे जाउन कोसळले. तसे मामा त्यांना सावरायला पुढे धावले. रघु काका पुर्ण भेदरलेले होते. पण सुष्माचे त्याच्याकडे अजिबात लक्ष नव्हते, आम्हाला दिसु शकत नसले तरी समजत होते की तिचे डोळे त्या छोट्या पक्षाकडे होते, सुष्माकडे जाताच तो जीव तिच्या हातातुन सुटून जाण्यासाठी जिवाच्या आकांताने प्रयत्न करत होता, पण त्याची फडपहड सुष्माच्या घट्ट पकडीसमोर चालत नव्हती, कानाला कर्कश्श वाटनारा त्या कोंबडीचा आवाज या सगळ्यामध्ये अतिषय भेसुर वाटत होता, पण सुश्मावर त्याचा काही परिणाम होत नव्हता, तिच्या चेहऱ्यावर एक आसुरी हास्य उमटलेले मला जाणवले. मी माझे डोळे आणि कान बंद करुन उभी होते, आणि थोड्याच वेळात त्या पक्षाची फडफड आणि आक्रोश थांबल्याचे जाणवले, माझे कान आणि डोळे सैल केले समोर.. सुष्मा एका हातात त्या कोंबडीचं तुटलेलं मुंडकं आणि दुसऱ्या हातात बाकीचे धड. तिने आपल्या दाताने कोंबडीची मान कुरतडून तीचा जिव घेतला होता आणि आता तिच्या मानेतुन भळाभळा बाहेर पडणारे रक्त ती ते धड उलटे करुन तोंडाला लावत होती, आणि सेकंदा सरशी तिच्या कळ्याचा गुटुम-गुटुम असा आवाज. असह्य. त्या रक्ताचा एक उघळ तिच्या तोंडातुन सुटून तिने घातलेल्या कुर्ती पर्यंत येत होता. मेलेल्या कोंबडीच्या शरिरातल्या रक्ताचा शेवटचा थेंब संपवुन, आपल्या रक्ताळलेल्या दात आणि नख्यानी त्या कोंबडीच्या धडाचा भाग फाडून खायला चालू केला. तिच्या बेड वर , अंगावर सर्वत्र मांसाचे तुकडे आणि रक्ताचे डाग पसरु लागले. आधिच्या हिणकस , किळसवाऱ्या दुर्गंधी मध्ये मांस आणि रक्ताची दुर्गंधी समावली. सुष्मा एखाद्या अधाशा सारखी त्या कोंबडीचे कच्चे मांस खात होती. एक एक भाग संपवुन आता तिच्याकडे काही शिल्लक राहीले नव्हते. तेव्हा एक मोठा करपट ढेकर दिला. आणि ती आहे तशी बेडवर कोसळली आणि पुन्हा झोपी गेली. साधारण पाउन तास चाललेला अभद्र प्रकार संपला.

इथुन पुढे सुष्माच्या रूम जायचे कोणाचे धाडस झाले नाही. यापुढे सुष्माच्या रूम मधुन तिचे ओरडलेले आवाज यायचे, कधी रडलेले आवज येत असत, पण सुष्माच्या रूमला बाहेरुन घातलेले कुलूप काढून आत जायचे धाडस कोणी केले नाही ना कोणीतरी ते करावे अशी कोणाची इच्छा झाली. घरामधे कोणीच कोणाशी बोलत नव्हते, परिस्थितीपुढे आम्ही सगळे असाह्य आणि लाचार होतो. देव-धर्माला न माननाऱ्या प्रताप काकांनी स्वत: कुठल्या तरी मंदिरामध्ये जावुन विधि करवुन एक नारळ उतरुन आणला होता. तो सुष्माच्या खोली मध्ये ठेवायला सांगितला

होता पण जाणार कोण ?  शेवटी काकां स्वत:च सुष्मा झोपलेली असताना दरवाजा उघडून आतमध्ये ठेवुन दिला. पण तोच नारळ दुसऱ्या दिवशी सुष्मा च्या खोलीच्या बाहेर भंगलेल्या अवस्थेत आम्हाला आढळला. थोडक्यात देवांचे आपल्यापुढे काही चालणार नाही असे तिला दाखवुन द्यायचे होते का ? हा प्रकार काहीतरी वेगळा आहे हे कळायला एवढ्या गोष्टी पुरेश्या होता. पण करणार काय. प्रभाकर मागे बोलला होता , त्याच्या कडे कोणीतरी मांत्रिक आहे म्हणुन, पण असले मांत्रिक प्रकारचे लोक लोकांना लुबाडतात असे अनेक किस्से प्रताप काकांकडूनच ऐकले मी ऐकले होते. पण त्या किस्स्यामद्ये अंधश्रद्धेच्या आहारी जाऊन लोक मांत्रिकांकडे जातात असे ऐकले होते. आमच्या बबातित प्रकार वेगळा होता.

विचार करुन करुन माझे डोके पुर्ण बधिर झाले होते. कोच वर बसले असताना प्रभाकरचा फोन आला.

“हा प्रभाकर बोल“

“आरती, कशी आहेस्व ?”

“कशी असणार .....”

“हम्म्म ! समजु शकतो. बरं ऐक. मागे मि तुला एका मांत्रिका बादल बोललो होतो, त्याचाशी अत्ताच एक तासापुर्वी बोलणे झाले. त्याला घडत असलेला सगळा प्रकार सांगितला. काही बोलला नाही, फक्त दरम्यान ज्या ज्या घडना घडल्या त्याची तारिखेनुसार आणि शक्य असेल तर वेळ सुद्धा, अशी एक लिस्ट काढून पाठवायला सांगितली आहे. आणि तो येत्या पौर्णिमेला जळगावला येणार आहे तेव्हा येईल आपल्याकडे.”

“आज सोमवार, पौर्णिमा बुधवारी आहे.”

“हो हो. त्याच्या आधी आपल्याला त्याने सांगितल्याप्रमाणे घटनांची लिस्ट पाठवायची आहे, मी माझ्या माहितिप्रमाणे यादी काढली आहे, ती एकदा व्हेरीफाय करुन घे..”

प्रभाकर ने त्याने तयार केलेली यादी मध्ये उल्लेख केलेल्या घटना त्याच दिवशी घडले असल्याची माझ्याकडून खात्री करुन घेतली.

या सगळ्या प्रकारा मध्ये घराची अवस्था वर्णन न केलेलीच बरी, सतत तणावाचे वातावरण, सुष्मा ची वाटणारी काळजी पण तिच्यासाठी काही करु शकत नसल्याची खंत, या प्रकाराचा काय अंत होणार ? नेमके काय संकट आपल्यावर आले आहे, त्यातुन काय मार्ग काढायला पाहीजे, त्यापेक्षा तसा मार्ग निघु शकतो की नाही याची सुद्धा आम्हाला कल्पना

नव्हती. सुष्माच्याच बाबतित हा प्रकार का ? असे कितीतरी असंख्य प्रश्न डोक्यात येवुन भेडसावुन जात. पण खुप विचार करुन उत्तर मात्र मिळत नव्हते. सतत आता काय होईल आणि कोणत्या प्रसंगाला तोंड द्यावे लागनार याची हुरहुर लागली असायची. आणि असेच घडायचे. मधुनच सुष्माच्या रूम मधुन मोठमोठ्याने ओरडल्याचे आवाज यायचे ती काय बोलायची कळत नव्हते, कधी कधी अतिषय भेसुर आवाजत रडायची, हे रडणे चांगले तासभर चालात होते.

एक दिवशी न राहुन आम्ही सगळ्यांनी सुष्माच्या रूम मध्ये जायचे ठरवले. त्या दिवशी मी मुद्दामुन प्रभाकर ला बोलवुन घेतले. प्रताप काकांनी सुष्माच्या रूम चे कुलूप काढले, दरवाजा उघडला तसा भस्स्कन किळसवाण्या, हिणकस, असह्य दुर्गंधीचा मारा आमच्यावर झाला. कमालिची दुर्गंदी, असं वाटत होतं जगातल्या सगळ्या दुर्गंधी असलेल्या गोष्टी एकवतल्या आहेत. आतमध्ये बेड वर सुष्मा अगदी निपचित पालथी झोपली होती, तिने घातलेला ड्रेस पुर्ण मळलेला होता. बेड वर आणि बाजुला मांसाचे तुकडे पडून कुजले होते, पडलेल्या रक्ताचे डाग कुजुन काळे पडले होते, त्याला मुंग्या आणि माशा लागल्या होत्या. त्या खोलीत एक अनोळखी भकासपणा जाणवत होता. या दृश्याने मनावर आलेले नैराश्य आणि हताशपणा अधिक अधिक गडद होत होता. नकारात्मकता नकारात्मकता काय असते ती प्रत्यक्ष जानवत होती, हात पुढे केला तर स्पर्ष होईल इतकी नकारात्मकता त्या एका खोलीत भरलेली अक्षरश: जाणवत होती, आणि या सगळ्याच्या केंद्रस्थानी होती 'सुष्मा'. गेली पाच दिवस ती या खोलूत बंदिस्थ होती. आम्हाला आमचीच लाज वाटली की आम्ही तिला एकटीला अशा अवस्थेत कशी सोडू शकतो. पण आम्ही स्वार्थी झालो होतो, हे मान्य करावेच लागेल. असे असले तरी आमच्य मनाची अवस्था आम्ही कोणला आणि कोणत्याही शब्दाअत समजवुन सांगु शकलो नसतो, ज्या वेळी तुमच्या आजु बाजुला ३६० अंशा मध्ये शंभर टक्के नकारात्मकता भरलेली असते तेव्हा तुमचे वागणे सुद्धा त्या नकारात्मकतेला समर्थक घडत जाते, आणि याच गोष्टीची जाणीव या वेळी झालेली होती. सुष्माला बघुन लता काकुंचा तोंडातुन त्यांनी केव्हापासुन दाबुन ठेवलेला हुंदका बाहेर पडला आणि मी भानावर आले. बाजुला काका उभे होते, त्यांच्या स्वभावा प्रमाने शांत, काही न बोलता. प्रभाकर नाकाला रूमाल लावुन अगदी अनिच्छेने उभ होता, कितीही जवळचा मित्र किंवा मैत्रिण असली तरी त्या जानीवे पेक्षा कितीतरी पटीने तिथली दुर्गंधी असह्य होती. काकानी पुढे सुष्माला जागे करण्याच्या पवित्र्यात पुढे गेले तसा प्रभाकर त्यांच्या मागे जाऊन उभारला.
काकांनी दोन चार हाका मारल्या पण सुष्माने प्रतिसाद दिला नाही. ती गाढ झोपेत होती हे

दिसतच होते. काकांनी तिला हळू हळू हलवुन उठवण्याचा प्रयत्न केला, पण त्याला पण प्रतिसाद मिळाला नाही, सुष्माला काही झाले तर नसेल ... ? छे छे विचार पण सहन होत नव्हता. प्रभाकर ने आमच्या कोणाच्या ही नकळत तिची नस चेक केली, ती चालू होती.

अनेक प्रयत्न करुन सुद्धा सुष्मा उठत नाही ही गोष्ट आम्हाला नविन नव्हती, त्यामुळे जास्त प्रयत्न व्यर्थ होता. काकांची न बोलता 'चला' असा इशारा केला, आणि तिथुन उठले. आणि अनिच्छेच्या इच्छेने आम्ही तिथुन काढता पाय घेतला.. एवढ्यात !!

पाठिमागुन कसलासा आवाज झाला, ती सुष्मा बोलली होती की काय वाजले होते कळाले नाही पण त्या आवाजाने आमची सगळ्यांचे पाय जागच्या जागी थांबले आणि आमच्या पाठमोऱ्या आकृत्या पुन्हा सुष्माकडे वळल्या, तीची वळवळ चालू झाली होती , पालथि झोपलेली सुष्मा उताणी व्हायचा प्रयत्न करत होती, तिच्या हलचाली मध्ये दिसुन येत असलेला वेगळा कृत्रिमपणा, अनोळखीपणा आणि वेगळेपना भितीची एक एक व्हेव फेकत होता आणि ती व्हेव सरळ अमाचे हृदय कापत होते, माझ्या छातीची धडधड कानाला ऐकू येईल इतकी वाढली होती, नेमकी का भिती वाटत होती याला काही कारण नव्हते पण काण आणि डोळ्यांच्या पलिकडे असलेल्या 'जाणिव' नावाच्या पदार्थाच्या माधमातुन भितीची एक एक सर आमच्या मनामधे क्षणा क्षणाला चर्र.. करुन जात होती.

सुष्माची हलचाल थांबली होती, ती आतापर्यंत बेड वर उठुन बसली होती, तिच्या तोंडावर पाण्याचा स्पर्षही न झाल्यामुळे जटा झालेले केस पसरले होते, त्यामुळे तिचा चेहरा दिसत नसला तरी  तिच्या केसांच्या पलिकडे लपुन बसलेल्या डोळ्याचा पांढरा भाग नजरेस आला आणि हा एक क्षण असेल तिच्याशी किंचीत नजरा नजर झाली आणि, मी माझे डोळे कचकण झाकुन घेतले सांगु शकत नाही माझे आधीच मोठ्याने धडधडत असलेले हृदय आता तोंडातुन बाहेर पडते की काय असे वाटू लागले, बहुतेक मला चक्कर येत होती, की भोवळ येत होती काही समजत नव्हते, पण मी तशी च्या तशी स्थब्ध उभि होते डोळे झाकुन, बाजुला कोण आहे किंवा नाही कशाची जाणिव होत नव्हती, आणि अशातच एक प्रचंड किंकाळी ऐकू आली. कानातुन सरळ मेंदुपर्यंत जाणारा असा आवाज. आणि मी खाली कोसळले.

***

माझे डोळे जड असल्याचे मला जाणवत होते तरीसुद्धा डोळे उघडण्याचा प्रयत्न करत होते. तेवढ्यात माझ्या बाजुला बसलेली व्यक्ती दुर जात असल्याचे जाणवले. हळू हळू पापण्या वेगळ्या होऊ लागल्या, माझे डोळे उघडले गेले. मी माझ्या बेड वर असल्याची जाणिव झाली, मजह्या बाजुला कदाचीत रघु कका बसले होते, आणि मला जाग येत असल्याचे लक्षात येताच ते इतरांना सांगायला गेले होते. मला जाग येवुन दोन मिनिट सुद्धा झाली नसतिल एवढ्यात सगळे लोक माझ्या खोलित जमा झाले.

“बाळ कशी आहेस ? कसं वाटतंय ?” लता काकुंनी माझ्या बाजुला बसुन विचारले. त्या वेळी प्रताप काका माझ्या डोक्याला हात लावुन ताप बघत होते.

“ठिक” शरिरात शिल्लक असलेली सगळी शक्ती एकवटून जरी बोलले असले तरी मला अजिबात बरं वाटत नव्हतं, माझं डोकं भयानक दुखत होतं आणि सुष्मा च्या खोलित अनुभवलेला प्रकार. त्याची जाणिव मनामध्ये घर करुन बसली होती, आज सुद्धा तो क्षण आठवला की माझ्या अंगावर काटा उभा राहतो.

“तुला खायला काय आणु का ?” लता काकू

“काही नको, फक्त पाणी द्या”.. किती वेळ किंवा दिवस मी पडुन होते मला माहीत नव्हतं आणि ते विचारायची हिम्मत पन होत नव्हती. फक्त डाव्या हाताला लागलेल्या बॅन्डेज च्या पट्टीवरुन एवढं लक्षात आलं की मला सलायन लावण्यात आलं होतं, त्यामुळे म्हणावा तसा अशक्तपणा वगैरे जाणवत नव्हता, सुधाकर पाणी घेवुन आला. आणि त्याच्या सोबत आणखिन दोन अनोळखी व्यक्ती खोलीत आल्या. त्यांच्या कपड्यांवरुन तरी ते डॉक्टर वाटत नव्हते, असो.

पाणि पिल्यावर थोडी हुशारी आली. मी तशीच पडून राहीले.

पाच मिनिटांनी प्रभाकर नी शांततेचा भंग केला.

“आरती, हे राज, त्यांनी सांगितल्याप्रमाणे आज आले आहेत.”

’राज ? म्हणजे ते मांत्रीक ?’

“हो, ऍक्च्युअली ते मांत्रिक नाहीत, ते अभ्यासक आहेत. ऑल इंडिनन पॅरानॉर्मल रिसर्च……” प्रभाकर सांगत होता पण त्या राज नामक व्यक्तीने प्रभाकर ला थांब असा इशारा केल्यावर तो मध्येच थांबला.

“ते महत्वाचे नाहिये, आपल्याला कामाला लागायला हवं. ” राज बोलत होता..

“पण राज, हा सगळा काय प्रकार आहे.. काय चाललंय, यावर उपाय काय काय, पर्याय काय ?
....” प्रभाकर एका दमात बोलत बोलत दम लागल्याने थांबला.
“प्रभाकर, तुम्ही आणि तुमचा परिवार कोणत्या मन:स्थितितुन जात आहे, याची मला पुर्ण कल्पना आहे, आणि तुमचे प्रश्न सुद्धा मी जाणुन आहे, पण कोणत्याही प्रश्नाची उत्तरे देण्याची किंवा चर्चा करत बसण्याची ही वेळ नाही, तुमच्या सगळ्या प्रश्नांची आपोआप मिळतिळ”
थोडा वेळ थांबुन राज पुन्हा पुढे बोलला.
“प्रभाकर तुम्ही काय करता ?”
“मी कॉलेज करतो, सुष्मा माझ्याच वर्गात शिकते”
“प्रतापराव तुम्ही ?”
“मी पाटबंधारे खात्यामधुन आता राजीनामा दिला आहे आणि आता अखिल भारतीय नौजवान संघटनेचा पुर्णवेळ काम करतो”
“म्हणजे तुम्ही कॉम्रेड आहात तर ..”
“होय”
“असो ! कॉम्रेड चला. ” असे म्हणुन राज सर्वांना बाहेर घेवुन गेला.
मांत्रिक म्हटल्यावर डोळ्यासमोर भगवी कपडे, डोक्यावर जटा, लांब दाढी, गळ्यात रुद्राक्षांच्या माळा, आणि काय काय ते.. अशी मुर्ती उभी राहते, पण राज च्या हातात एका छोट्या रुद्राक्षाच्या माळे ऐवजी तसला काहीच बनाव नव्हता. स्वच्छ पांढरा शर्ट आणि काळी पँट, एकदम साधा पेहराव , व्यवस्थित विंचरलेले केस, सडपातळ पण चपळ बांधा, इतरांपेक्षा जरा जास्त मोठे कपाळ आणि त्या कपाळावर किंचित पडलेली आठी, पण या सगळ्यात उठावदार होते त्याचे डोळे, त्याच्या डोळ्यात एक वेगळ्याप्रकारचा करारीपणा होता. त्याची नजर त्याला इतरांपेक्षा वेगळे बनवत होती, आपल्यापेक्षा त्याच्यात काहीतरी वेगळे आहे याची नकळत का होईना जाणिव होत होती.
सगळे बाहेर गेले होते, थोड्या वेळात मी सुद्ध हॉल मध्ये जावुन बसले.
“सगळे साहीत्य आणले का बबलू ?” राज बबलू ला विचारत होता, बबलू नावाचा व्यक्ती राज सोबत आलेला होता.
“हो भैया !”
“ठिक आहे, प्रभाकर , अजुन दोन तिन लोक लागतिल, अगदीच गरज पडली तर, तुमच्या जवळच्या मित्रांपैकी कोणाला तरी बोलावुन घ्या”

“ठिक आहे…” असे बोलुन प्रभाकर आपला फोन घेवुन बाहेर गेला. सगळी चललेली लगबग बघुन काहीतरी नक्की होणार होते, बहुतेक एक्झॉर्सिझन टाईप काहीतरी.
साधारण एक तास गेला असेल. प्रभाकर ने बोलावलेले त्याच्या क्लास मधील मित्र अंकुश व चेतन आले होते. सगळे शांत पण आपापसात काही ना काही कुजबुजत बसले होते, प्रसंग ओळखुन राजने बोलायला सुरवात केली.
“ठिक आहे ! मगाशी मी सुश्मा च्या खोलीत गेलो होतो, तिला काय झाले आहे आणि त्यासाठी जो काही प्रकार करावा लागनार आहे त्यासाठी आपण सगळे इथे जमलोय, आणि आता लगेचच आपण कामाला सुरवात करणार आहोत, तत्पुर्वी तुम्हाला सांगने गरजेचे आहे की मी आणि माझा मित्र बबलू दोघे सुष्माच्या खोलीत जाऊ बाकी कोणीही काही झाले तरी बोलावल्याशिवाय आत येवू नका, काय प्रकार चालला आहे हे बघण्याची उत्सुकता असेल आणि तुमचे मन घट्ट असेल तर बाजुची खिडकी आहे. हे करत असताना कोणत्या प्रकाराशी सामना करायचा आहे आणि त्याची स्ट्रेंथ किती आहे हे मी सुद्धा सांगु शकत नाही, कदाचीत तुम्हाला अशा गोष्टी पहायला मिळतील ज्या तुम्हि कधी स्वप्नात पण विचार करु शकणार नाही, त्यामुळे तेवढी तयारी असेल पुढे या अथवा…. ”  थोडे थांबुन राज ने माझ्याकडे नजर टाकली व केवळ मला ऐकू येईल अशा आवाजात विचारले “आरती आपल्यापैकी हार्ट पेशंट कोणी नाही ना ?”
मी केवळ नकारार्थी मान हलवली, काहीतरी विचित्र घडणार आहे याची कल्पना आता सगळ्यांना आली होती.
“सर,जे काही करयचं ते करा, पण यात सुष्माला काही धोका नाही ना ?” प्रताप काका अगदी काकुळतीला येवुन विचारत होते.
“हे मी पण सांगु शकत नाही सर, पण आज ती ज्या यातना भोगतेय याची आपण कल्पना पण करु शकत नाही…”
नेहमीच काहीतरी गुढ बोलायचं असा बहुतेक राज चा स्वभाव असावा. असो.
’चला” असा इशारा करुन राज व बबलु पुढे झाले, प्रताप काकांनी सुष्माच्या खोलीचा दरवाजा उघडला. तसा पुन्हा तीच दुर्गंधी, प्रभाकर ला राज ने आत बोलावले. आणि लगेच दरवाजा लावुन घेतला. आम्ही सगळ्यांनी बाजुच्या खिडलीला धरुन आपापल्या जागा निवडल्या व आत चालू असलेला प्रकार पाहू लागलो.
सुष्मा तशीच निपचित पडली होती, आपण इथे काहीतरी करतोय याची तिला भनक लागू नये अशा पद्धतीने तिघे आत गेले.

राज ने बबलु कडे हात केला तसा बबलू ने दोन मजबुत दोरखंड राजच्या हातात दिले, त्याने ते प्रभाकर च्या हातात दिले व काणात काहीतरी पुटपुटला, तसा प्रभाकर पुढे होऊन प्रथम हळूच सुष्मा चा एक हात त्या दोरखंडाच्या एका नोड ने घट्ट बांधला व दुसरा नोड बेड ला असलेल्या लोखंडी बार ला बांधला, तसाच प्रकार दुसऱ्या हाताला केला. प्रभाकरने हे काम इतक्या बेमालुमपणे केले होते की सुष्मा अजुन आहे तशी निपचीतच होती. सुष्माचा बेड खोलीच्या मधोमध होता. राज ने बबलु च्या बॅग मधुन एक पांढऱ्या रंगाची बॉटल काढली व त्यातल्या पाण्याने सुष्माच्या बेडच्या बाजुने एक रिंगण आखले.
ते करत असनाता बबलूने बॅग मधुन एक कुंड बाहेर काढले. सुष्माच्या बेड च्या बरोबर समोरच्या मोकळ्या जागेमध्ये त्याच बॉटल मधले पाणी शिंपडले व मधोमध ते कुंड ठेवुन दिले आणि त्यासाठी लागणाऱ्या एक एक वस्तु तो त्या कुंडाच्या बाजुला काढुन ठेवत होता, त्यामध्ये दहा-बारा गोवऱ्या व चार जळाऊ लाकडे, हलत-कुंकू, नाना-प्रकारच्या वणस्पतिंची पाणे, गाईच्या तुपाची एक बरणी आणि पाणी असलेल्या सात-आठ छोट्या डब्या वगैरे...
राज ने कुंडाच्या ठिकाणी एक नजर टाकली, बहुतेक जिन्नस प्रमाणात आहेत याची खात्री करुन बबलु इशारा केला तसा बबलु सुष्माच्या डाव्या बाजूला जावून उभा राहीला, नंतर त्याने प्रभाकर ला इशारा केला, तसा तो ही सुष्माच्या बेड च्या उजव्या बाजुला जावुन उभा राहीला.
राज कुंडाच्या ठिकाणी वळला , त्याने बॅग मधुन मारुतीची एक प्रतिमा बाहेर काढली, ही प्रतीमा मारुतीच्या इतर बाजारातील फोटो पेक्षा वेगळी होती, पंचमुखी मारुती म्हणतात त्या प्रकारातली पण वेगळी, त्या प्रतिमेला लागलेल्या गंधांवरुन ती रोजच्या वापरातली असावी असं दिसत होतं. जार ने ही प्रतीमा कुंडाच्या बरोबर समोर ठेवुन दिली. बाजुला असलेल्या उदबत्यांचा अक्खा जुगडा फोडून पेटवला, सोबत धुप पेटवला. सोबत आणलेल्या जळाऊ लाकडे पेटवुन त्याच्या विस्तव बनवला आणि त्यावर साधारण चार-पाच मुठी भरुन उद टाकला तसा चर्र चर्र असा आवाज करत उद पेट घेत सुटला. संपुर्ण खोली एका सात्विक सुगंध असलेल्या धुराने भरुन गेली, इतकी की आत बसलेल्यांना ठसका लागावा. इतका वेळ निपचित पडून असलेली सुष्मा आता मात्र हलचाल करु लागल्याचे दिसत होते पण ती पुर्ण जागीऊ झाली नव्हती. नुसती चुळबुळ चालू होती. सगळ्या वस्थु त्या त्या ठिकाणी ठेवुन राजे ने बबलू आणि प्रभाकर कडे पाहीले आणि 'डन' असा इशारा केला, बहुतेक त्याचा अर्थ आता आपण सुरवात करुया असा असावा.
राज आपल्या जागेवरुन उठला, त्याच्या हातात भडक लाल रंगाची एक बॉट्ल होती, उठुन तसाच सुष्मा च्या चेहऱ्या जवळ गेला, तिथुन जवळ असलेल्या प्रभाकर ला कसला तरी इशारा केला

तसा प्रभाकर ने सुष्माच्या चेहऱ्यावर आलेले केस मागे टाकले, आता सुष्माचा चेहरा स्पष्ट दिसत होता, पण आम्हाला त्या चेहऱ्यात सुष्मा दिसत नव्हती, तिचे गाल या वेळी चांगलेच सुजले होते, एवढे दिवस काही न खाऊन  सुद्धा तिच्या तब्बेतित अजिबात उतार झाला नव्हता, उलट सिंहकटी असलेल्या सुष्माचे पोट वर आले होते, त्यामुळे ती जाड दिसत होती, डोळे संपुर्ण काळवंडले होते, रक्ताचे आणि मांसाचे डाग अजुन तिच्या ओठावर आणि तोंडावर तसेच होते, डोळे संपुर्ण काळवंडले होते.

राज ने सुष्मा कडे एक नजर टाकली. आपल्या एका हातात असलेल्या पाण्याच्या बॉटल मधुन दुसऱ्या एका हातात मावेल एवढे पाणी घेतले, आणि तो हात तसाच सुष्माच्या कपाळावर मारला, तसा चप्प असा आवाज झाला आणि खाडकण सुष्माचे डोळे उघडले, जे आतापर्यंत दिसु शकले नव्हते ते ... नेहमीपेक्षा कितीतरी पटीने मोठे , भयानक. सुष्मा उठली होती आणि तशी तिच्या तोंडातुन घोरल्या सारखा आवाज काढत होती, सेकंदा सेकंदा सरशी तो आवाज मोठा होत होता. मी प्रभाकर कडे पाहीले तर तो पुरता घाबरलेला होता. पण बबलु स्थब्ध होता आणि राज ने अति-तिक्षण कटाक्ष सुष्मा कडे रोखलेला होता. राज ने आपल्या हातातील बॉटल बबलू कडे दिली आणि त्याच हतात लपवलेली एक पुडी उघडली, त्यात कसला तरी अंगारा असावा, तो एका हतात घेतला आणि सुष्माच्या उघड्या असलेल्या डोळ्याच्या दिशेने भस्स्कन फेकला. तशी एक अतर्क्य किंकाळी सुष्मा ने फोडली, असह्य त्या खोली ला काचा असत्या तर त्या फोडीत ती किंकाळी बाहेर पडली असती, असह्य होऊन मी माझे कान शक्य तेवढ्या ताकतीने झाकले, त्या किंकाळी सरशी झोपलेली सुश्मा उठुन बसली. समोर राज उभा होता, बापरे, करड्या रोखाने राज सुष्मा कडे बघत होता,